# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

निर्णय, क्रमांक : अरजा २४०२/२५/सेवा-८,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ७ ऑक्टोबर, २००२.

## *निर्णय*

**मार्च २००२ च्या अर्थसंकल्पीय भाषणात शासकीय कर्मचाऱ्यांना "असाधारण रजा योजना" लागू करण्याचे धोरण घोषित करण्यात आलेले आहे. सदरहू धोरण अंमलात आणण्यासाठी शासन आता खालीलप्रमाणे योजना कार्यान्वित करण्याचा निर्णय घेत आहे :-**

१) या योजनेस **" विशेष असाधारण रजा योजना "** असे संबोधिण्यात यावे.

२) **ही योजना आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ते दि.३१.१२.२००४ पर्यंत अंमलात राहील.**

३) विशेष असाधारण रजा योजना ही **शिक्षक, डॉक्टर, परिचारीका, परिचारक व पोलीस हे संवर्ग वगळून** इतर संवर्गातील कर्मचाऱ्यांना लागू राहील.

४) जे कर्मचारी दि.३१.१२.२००४ पूर्वी विशेष असाधारण रजेसाठी अर्ज करतील त्यांचे रजेचे अर्ज विचारात घेता येतील. अशा प्रकरणी विशेष असाधारण रजा दि.३१.१२.२००४ पासून किंवा तत्पूर्वीच्या दिनांकापासून सुरू झालेली असावी.

५) विशेष असाधारण रजा योजनेचा लाभ संपूर्ण सेवेच्या कालावधीत ५ वर्षाच्या मर्यादेपर्यंत फक्त एकदाच घेता येईल. मात्र जर संबंधित कर्मचारी ५ वर्षाच्या कालावधीची रजा संपुष्टात आल्यानंतर शासन सेवेत रूजू झाला नाही तर या योजने खाली अनुज्ञेय ठरणारे लाभ मिळण्यास तो पात्र ठरणार नाही.

६) विशेष असाधारण रजा पूर्व परवानगीने मंजूर करून घेणे आवश्यक राहील.

७) **अनधिकृतपणे अनुपस्थित असलेल्या कर्मचाऱ्यास विशेष असाधारण रजा मंजूर करता येणार नाही.**

८) फक्त नियमित व योग्य मार्गाने सेवेत प्रविष्ट झालेल्या किमान ५ वर्षे इतकी संतत सेवा असलेल्या स्थायी/अस्थायी कर्मचाऱ्यांना विशेष असाधारण रजा मंजूर करता येईल.

९) **विशेष असाधारण रजा मंजूर करण्यास "नियुक्ती प्राधिकारी" सक्षम असतील.** या योजनेंतर्गत कर्मचाऱ्याने रजा सुरू होण्यापूर्वी किमान एक महिना अगोदर कार्यालय प्रमुखांकडे अर्ज करणे आवश्यक आहे. कार्यालय प्रमुखांने आपल्या शिफारशीसह दोन दिवसात अर्ज नियुक्ती प्राधिकाऱ्याकडे पाठवावेत. नियुक्ती प्राधिकाऱ्याने अर्ज प्राप्त झाल्यापासून ७ दिवसात आपला निर्णय संबंधित कर्मचाऱ्यास कळविणे आवश्यक राहील. तथापि, जर सदरहू कर्मचाऱ्यास फेरविचारांती त्याने दिलेला विशेष असाधारण रजेचा अर्ज मागे घ्यावयाचा असेल तर त्याने, नियुक्ति प्राधिकाऱ्यांकडून त्याच्या रजा मंजूरीचे आदेश निर्गमित केले जाण्यापूर्वी , तसे कार्यालय प्रमुख व नियुक्ति प्राधिकारी यांना कळविणे आवश्यक राहील.

१०) (अ) कर्मचाऱ्याला कमाल ५ वर्षांच्या कालावधीपर्यंत, परंतु नियत वयमानाच्या मर्यादेत, विशेष असाधारण रजा मंजूर करता येईल. मात्र या योजनेखाली कर्मचाऱ्याने **किमान एक वर्ष** इतकी विशेष असाधारण रजा घेणे अनिवार्य राहिल. तथापि खालील अट क्र.२० मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार, पदोन्नतीसाठी पात्र ठरल्याच्या परिणामी विशेष असाधारण रजेचा कालावधी कमी करून पदोन्नतीच्या पदावर रूजू होऊ इच्छिणा-या कर्मचाऱ्यांच्या प्रकरणी मात्र ही किमान मर्यादा लागू असणार नाही. तसेच विशेष असाधारण रजेवर असताना कर्मचारी, प्रकरणपरत्वे, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम १०, ६५ व ६६च्या तरतूदीनुसार स्वेच्छा सेवा निवृत्ती घेण्यास पात्र ठरत असेल तर संबंधित कर्मचाऱ्यास विशेष असाधारण रजेवर असताना लेखी नोटीस देवून नोटीशीच्या दिनांकापासून स्वेच्छा सेवा निवृत्ती घेता येईल. स्वेच्छा

निवृत्तीसाठी अर्हताकारी सेवेची गणना करताना त्यात विशेष असाधारण रजेचा कालावधी विचारात घेतला जाईल. अशा प्रकरणी स्वेच्छा निवृत्ती मंजूर करण्यास नियुक्ती प्राधिकारी सक्षम असतील.

(ब) विशेष असाधारण रजेवर असलेल्या कर्मचाऱ्याचे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ च्या नियम १०(४) व नियम ६५(१) अनुसार सेवेत पुढे चालू ठेवण्याबाबत पुनर्विलोकन करता येईल व याकरीता विशेष असाधारण रजेवर जाण्यापूर्वीचे ५ वर्षांचे गोपनीय अहवाल विचारात घेण्यात येतील.

११) अभियांत्रिकी सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांच्या बाबतीत संवर्गातील एकूण मंजूर पदांच्या जास्तीत जास्त १० टक्के इतक्या कर्मचाऱ्यांचे विशेष असाधारण रजेचे अर्ज मंजूर करता येतील.

१२) विशेष असाधारण रजेच्या दिनांकाला जर कर्मचाऱ्याविरूध्द विभागीय चौकशी किंवा फौजदारी कार्यवाही प्रस्तावित/प्रलंबित असेल किंवा तो निलंबनाखाली असेल तर अशा कर्मचाऱ्याला विशेष असाधारण रजा मंजूर करता येणार नाही.

१३) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता अबाधित राहील.

१४) विशेष असाधारण रजेचा कालावधी निवृत्तिवेतन विषयक लाभांसाठी "अर्हताकारी सेवा" म्हणून ग्राहय धरला जाईल.

१५) विशेष असाधारण रजा मंजूर केल्याच्या परिणामी रिक्त झालेले संबंधित पद भरता येणार नाही व त्या पदावर नवीन नेमणूक करता येणार नाही. विशेष असाधारण रजा मंजूर केल्याच्या कारणास्तव रिक्त झालेले पद भरणे जर प्रशासकिय दृष्टया आवश्यक असेल तर त्याच संवर्गात अन्य पद रिक्त ठेवून ते पद नियुक्ती प्राधिकारी केवळ बदलीने भरू शकतील. **नवीन नेमणूक मात्र करता येणार नाही.**

१६) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत संबंधित कर्मचारी ज्या सेवेत असेल त्या सेवेतील कर्तव्य व जबाबदाऱ्यांशी निगडीत नसलेली इतरत्र खाजगी नोकरी (परदेश नोकरी / Foreign Assignment सह) अथवा व्यवसाय करू शकेल. त्यासाठी सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, त्याने अशा इतरत्र खाजगी नोकरी (परदेश नोकरी / Foreign Assignment सह) अथवा व्यवसायासंबंधीचा संपूर्ण तपशील शासनास कळविणे आवश्यक राहील.

१७) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत रजा वेतन, स्थानिक पुरक भत्ता, घरभाडे भत्ता तसेच पदास अनुज्ञेय असलेले इतर सर्व भत्ते देय राहणार नाहीत. मात्र, विशेष असाधारण रजेवरून सेवेत पुन्हा रूजू झाल्यानंतर विशेष असाधारण रजेच्या कालावधीत ज्या नियमित वार्षिक वेतनवाढी देय झाल्या असत्या त्या वार्षिक वेतनवाढी काल्पनिकरित्या देय होतील. मात्र अशा काल्पनिक वार्षिक वेतनवाढीमुळे वेतन व भत्त्याची कोणतीही थकबाकीची रक्कम देय राहणार नाही. निवृत्तिवेतन विषयक लाभांची परिगणना करतांना मात्र, काल्पनिक वेतनवाढी विचारांत घेतल्या जातील.

१८) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत अर्जित व अर्धवेतनी रजा कर्मचाऱ्याच्या खाती जमा केल्या जाणार नाहीत.

१९) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत पदाच्या अनुषंगाने मिळणारे सर्व फायदे/सोयी-सुविधा अनुज्ञेय ठरणार नाहीत. उदा. दूरध्वनी, शासकीय वाहन, रजा प्रवास सवलत, स्वग्राम रजा प्रवास सवलत इत्यादी. विशेष असाधारण रजेच्या कालावधीत कर्मचारी शासकीय निवासस्थान आपल्या ताब्यात ठेऊ शकेल. मात्र त्याला, रजेच्या पहिल्या १२ महिन्यांच्या कालावधीसाठी विहीत सामान्य दराने ( Normal rate) व तदनंतरच्या कालावधीसाठी आर्थिक दराने (Economy rate) अनुज्ञप्ती शुल्क व शासकीय निवासस्थानाशी संबंधित सेवाशुल्क तसेच मुख्य निवासस्थानाच्या सोबतच्या अतिरिक्त जागेसाठी आकारले जाणारे विहित शुल्क भरावे लागेल.

२०) **(अ)** विशेष असाधारण रजेवर असलेल्या कर्मचाऱ्याची मूळ संवर्गात सेवा जेष्ठता अबाधीत ठेवण्यात येणार असल्याने त्या ज्येष्ठतेनुसार पदोन्नतीसाठी विचार करतांना पदोन्नतीच्या पदाच्या सेवा प्रवेश नियमातील आवश्यक ती अर्हता प्राप्त केली असल्यासच पदोन्नतीचा विचार करण्यात येईल. त्यासाठी विशेष असाधारण रजेवर जाण्यापूर्वीच्या ५ वर्षांचे गोपनीय अभिलेख विचारात घेण्यात येतील. पदोन्नतीसाठी अनुभवाचा कालावधी विहित केला असल्यास असाधारण रजेचा कालावधी हा अनुभवाचा कालावधी म्हणून गणला

जाईल. या निकषानुसार संबंधित कर्मचारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्यास पदोन्नती देण्याचे आदेश निर्गमित करण्यात येतील. त्या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्याने, विशेष असाधारण रजेचा कालावधी कमी करुन पदोन्नतीच्या पदावर रुजू होणे किंवा विशेष असाधारण रजेचा कालावधी संपल्यानंतर पदोन्नतीच्या पदावर रुजू होणे या संबंधीचा लेखी स्वरुपात विकल्प सादर करणे आवश्यक राहील. रजा संपल्यानंतरच पदोन्नती स्वीकारण्याचा विकल्प कर्मचाऱ्याने दिल्यास अशा कर्मचाऱ्यास, तो रजा संपवून मूळ संवर्गात परत आल्यास त्यास वरीष्ठ पदाच्या पदोन्नतीचा मानीव दिनांक व त्या अनुषंगाने पदोन्नतीच्या संवर्गात ज्येष्ठता अनुज्ञेय होईल. मात्र अशा कर्मचाऱ्याने पदोन्नतीच्या पदावर प्रत्यक्षात पूर्वी काम केले नसल्याने मानीव दिनांकाच्या अनुषंगाने केवळ वेतननिश्चिती करण्यात येईल. मात्र विशेष असाधारण रजेच्या कालावधीसाठी त्यास पदोन्नतीच्या पदाचे वेतन व भत्त्याची थकबाकी अनुज्ञेय होणार नाही.

**(ब)** पदोन्नतीसाठी विभागीय परीक्षा अर्हता म्हणून विहित केल्या असल्यास व त्यासाठी काही कालावधी/संधी विहित केल्या असल्यास विशेष असाधारण रजेवर असतांना देखील कर्मचाऱ्याने नियमात विहित केलेल्या कालावधीत व संधीत संबंधित विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्याची दक्षता स्वतः घेणे आवश्यक आहे. विहित संधी / कालावधीत परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे होणारे परिणाम विचारात घेवून पदोन्नतीसाठीची ज्येष्ठता ठरविणे, वेतनवाढी रोखणे इत्यादी बाबींना कर्मचारी केवळ विशेष असाधारण रजेवर आहे या कारणास्तव बाधा उत्पन्न होणार नाही.

२१) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत **"गट विमा योजनेंतर्गत"** वर्गणी वसुल करण्यासंदर्भात राज्य शासकीय गट विमा योजना, १९८२ मधील परिच्छेद ९ मध्ये विहीत केलेली कार्यपध्दती अवलंबविण्यात येईल.

२२) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत **"भविष्य निर्वाह निधीची "** वर्गणी वसूल करण्याचे स्थगित करण्यात येईल.

२३) आर्युविमा योजना तसेच पोस्टाच्या वेगवेगळ्या योजना यांचे हप्ते भरणे, तसेच शासन/वित्तिय संस्था/सहकारी बँका/सोसायट्या इत्यादींकडून घेतलेल्या कर्जाच्या हप्त्यांची नियमितपणे परतफेड करणे याबाबतची जबाबदारी संबंधित कर्मचाऱ्यांची राहील.

२४) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यास अन्य मार्गाने उत्पन्न मिळविण्याची परवानगी देण्यात आलेली असल्यामुळे आयकर व त्याबाबतची विवरणपत्रे भरण्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित कर्मचाऱ्याची राहील.

२५) विशेष असाधारण रजेच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्याविरूध्द विभागीय चौकशी किंवा फौजदारी कार्यवाही करता येईल.

२६) विशेष असाधारण रजा, निवृत्तिवेतन विषयक लाभांसाठी "अर्हताकारी सेवा" म्हणून ग्राहय धरली जाणार असल्यामुळे ही रजा " विशेष असाधारण रजा योजनेखाली " मंजूर करण्यात येत असल्याबाबतची स्पष्ट नोंद सेवापुस्तकात लाल शाईने घेण्यात यावी.

२७) विशेष असाधारण रजेवर जाणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या संवर्गातील पद रजा कालावधीत नव्याने भरण्यात आल्याचे आढळून आल्यास असे पद भरण्यास कारणीभूत असणारे संबंधित अधिकारी महाराष्ट्र नागरी सेवा(शिस्त व अपिल) नियम, १९७९ च्या तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कार्यवाहीस पात्र ठरतील.

२८) विशेष असाधारण रजेवर असतांना जर संबंधित कर्मचारी मृत्यु पावला तर त्याच्या कुटुंबियास, सदरहू कर्मचारी सेवेत कार्यरत असतांना जर तो मृत्यु पावला असता तर जे लाभ अनुज्ञेय ठरले असते ते सर्व लाभ मंजूर केले जातील. मात्र, त्यांना संबंधित कर्मचाऱ्याने उपभोगलेल्या विशेष असाधारण रजेच्या कालावधीतील वेतन व भत्त्याच्या थकबाकीची रक्कम अनुज्ञेय ठरणार नाही.

२९) विशेष असाधारण रजा योजना राबविल्यामुळे प्रशासकीय दृष्टीकोनातून काही अडचणी निर्माण झाल्या असतील तर त्याबाबतचा तसेच या योजनेंतर्गत एकूण किती अधिकारी/कर्मचा-यांना रजा मंजूर करण्यात आली व त्यामुळे एकूण किती वार्षिक बचत होईल याबाबतचा दि.३१.१२.२००२, ३१.१२.२००३ व ३१.१२.२००४ हया वर्षाअखेरचा

अहवाल मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अनुक्रमे दि.३१.१.२००३, ३१.१.२००४ व ३१.१.२००५ पर्यंत पाठविणे आवश्यक राहिल.

२. शासन असाही आदेश देत आहे की, विशेष असाधारण रजेस महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ व महाराष्ट्र नागरी सेवा(निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील सध्याच्या असाधारण रजेच्या तरतूदी लागू राहणार नाहीत.

३. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्या संबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करून शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदेतील कर्मचाऱ्यांनाही लागू राहतील.

४. शासन असाही आदेश देत आहे की, मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे आणि त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यांमधील कर्मचाऱ्यांनाही वरील निर्णय, योग्य त्या फेरफारांसह, लागू राहतील.

५. हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १७२४/१२ दिनांक ३१.८.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**वसन्त वा. चौधरी,**
**शासनाचे उप सचिव.**

प्रति,

¿महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),

¿महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),

¿महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),

¿महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),

¿ संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),

¿अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (२५ प्रती),

¿मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),

¿उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १० प्रती),

¿वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),

¿निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),

¿ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),

¿राज्यपालांचे सचिव,

¿मुख्य मंत्र्यांचे सचिव,

¿उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,

¿ सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,

¿*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

¿*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

¿*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

¿*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

¿*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

¿*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,

¿मंत्रालयातील सर्व विभाग,

¿विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

¿मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

¿ सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),

¿ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

¿ सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती),

¿ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

¿शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),

¿ तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),

¿कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),

¿कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),

¿कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),

¿कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),

¿ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),

¿शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),

¿उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजंन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),

¿कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),

¿वित्त विभागातील सर्व कार्यासने,

¿निवड नस्ती, कार्यासन सेवा-८.

¿ *सदरहू शासन निर्णयाची प्रत www.maharashtra.gov.in व finance.mah.nic.in या संकेत स्थळां(website) वरही उपलब्ध आहे.*

*पत्राद्वारे.